फटाक्याच्या दुष्परिणामांबाबत जागृती करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण -१११९/(प्र.क्र.१५७/१५)/समन्वय**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: ०९ नोव्हेंबर, २०१५.

वाचा - पर्यावरण विभागाचे परिपत्रक क्र.हवाप्र/ध्वनिप्र/१०९९/७२४/प्र.क्र.५०/तां.क.३, दि.१६ ऑक्टोबर, २००१.

**परिपत्रक -**

फटाक्यांचा वापर/परवाना देण्यासंदर्भात काही सूचना देण्याबाबत श्री.अर्जून गोपाल व इतर यांनी केन्द्र शासन व इतर यांचे विरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयात याचिका ( WP( Civil ) No.728 of 2015) दाखल केली होती. सदर याचिकेत मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.१६.१०.२०१५ रोजी खालील प्रमाणे आदेश दिले आहेत. :-

> " The Union Governments and all the State Governments will give wide publicity both in print and Electronic media to the ill effects of fireworks and advice people accordingly.
>
> We also direct the Teachers / Lecturers/ Assistant Professors /Professors of the schools and Colleges to educate the students about the ill effects of the fireworks. "

२. सणांच्यावेळी मोठया आवाजाचे फटाके उडविल्यामुळे निर्माण होणाऱ्या ध्वनी व हवा प्रदुषणाचे जनतेवर होणारे संभाव्य अपायकारक परिणाम टाळण्यासाठी असे फटाके वाजविण्यावर निर्बंध घाल्ण्याच्या अनुषंगाने पर्यावरण विभागाच्या संदर्भाधिन दि.१६ ऑक्टोबर, २००१ च्या परिपत्रकान्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यामध्ये राज्याच्या शिक्षण विभागाने राज्यातील शिक्षण संस्थांच्या व्यवस्थापक व मुख्याध्यापकांना ध्वनी व हवा प्रदुषणाचे अपायकारक परिणाम टाळण्यासाठी शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना योग्य प्रशिक्षण देण्याच्या दृष्टीने उचित पाऊले उचलण्याबाबत निर्देश देण्याचे सूचित करण्यात आले आहे. तरी उक्त परिपत्रकातील सूचनांचे पालन करण्यात यावे.

३. पर्यावरण विभागाचे संदर्भाधिन परिपत्रक व मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या वरील आदेशाच्या अनुषंगाने फटाक्याच्या दुष्परिणामांबाबत विद्यार्थ्यांमध्ये जागृती निर्माण करण्याच्या दृष्टीने खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत. :-

१) फटाक्यांच्या वापरामुळे वायुप्रदुषण व ध्वनीप्रदुषण होऊन पर्यावरणावर त्याचा विपरित परिणाम होत असल्याने शक्यतो फटाक्यांचा वापर करु नये व फटाक्यांचा वापर करावयाचा झाल्यास कमी शक्तीच्या फटाक्यांचा वापर करण्याबाबत महाविद्यालयीन विद्यार्थ्यांमध्ये जागृती निर्माण करुन त्यांचे मत परिवर्तन करण्याचे काम संबंधीत महाविद्यालयातील शिक्षकांनी करावे. याबाबत संबंधीत शिक्षकांना प्रोत्साहन देण्याचे काम त्या महाविद्यालयाच्या प्राचार्यांनी करावे.

२) फटाक्यांच्या आवाजामुळे व त्यातून निर्माण होणाऱ्या धुरामुळे होणारे ध्वनी आणि वायू प्रदूषणाचे मानवी जीवनावर तसेच पर्यावरणावर होणारे एकूण दुष्परिणाम विद्यार्थ्यांना विस्तृतपणे पटवून देऊन फटाक्यांबाबत वाटणारे आकर्षण कमी करण्याचे प्रयत्न करण्यात यावेत.

३) फटक्यांचा वापर केल्यामुळे होणाऱ्या दुष्परिणामांची माहिती देण्यासाठी तसेच फटक्यांचा वापर करतांना तो काळजीपूर्वक व जबाबदारीने कसा करावा याबाबत विद्यार्थ्यांना नियमातील तरतूदींची माहिती देण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०९१७२१४०५४०८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamini R Pilankar

Digitally signed by Kamini R Pilankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=791d70f75a8bfaa8349786f02d71cad4fb9d1999ea0d92d63dcf5de198d4f817, cn=Kamini R Pilankar
Date: 2015.11.09 17:40:39 +05'30'

**( का. रा. पिळणकर )**
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
७. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११.कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे.
१२.निवडनस्ती.